श्री. ललित मुऱ्हारी खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक :-सप्रका-१४१५/११९१/प्र.क्र.२०७/नवि-२७,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र.एचएएन-१२१४/प्र.क्र.२५७/२१, दि.२९.०९.२०१४.

२. नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.टिपीव्ही-२४१५/१०२१/प्र.क्र.५२/नवि-२७, दि.०२ मार्च, २०१५.

३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/बदली-सनर/२०१५/प्रशा-१/१५९५, दि.०९.०३.२०१५.

४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/गपंपु-सनर/सप्रका/प्रशासन-१/४७८९, दि.२९.०७.२०१५.

प्रस्तावना :-

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री. ललित मुऱ्हारी खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार हे तत्कालीन मा. मंत्री, रोजगार हमी योजना व जलसंधारण यांच्या आस्थापनेवर "विशेष कार्य अधिकारी" म्हणून प्रतिनियुक्तीने कार्यरत होते. तत्कालीन मा. मंत्री मंडळाने राजीनामा दिल्याने सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या संदर्भ-१ येथील दि.२९.०९.२०१४ च्या कार्यालयीन आदेशान्वये श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांच्या सेवा मूळ विभागाकडे म्हणजे नगर विकास विभागाकडे दि.२९.०९.२०१४ (म.नं.) पासून प्रत्यावर्तीत केल्या होत्या. त्यास अनुसरुन श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार हे दि.३०.०९.२०१४ (म.पू.) पासून नगर विकास विभागात रुजू झाले होते.

**०२.** नगर विकास विभागाच्या संदर्भ-२ येथील दि.०२.०३.२०१५ च्या शासन पत्रान्वये श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांना दि.३०.०९.२०१४ (म.पू.) पासून विभागात रुजू करुन घेण्यास मान्यता देण्यात येऊन त्यांना संचालनालयाच्या आस्थापनेवर दि.३०.०९.२०१४ (म.पू.) पासून

रुजू करुन घेऊन पदस्थापना देण्याबाबत संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात आले होते.

**०३.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भ-३ येथील दि.०९.०३.२०१५ च्या कार्यालयीन आदेशान्वये श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांना संचालनालयाच्या आस्थापनेवर रुजू करुन घेऊन त्यांना कार्यकारी अभियंता, अमंलबजावणी कक्ष, नागपूर या कार्यालयातील सहाय्यक नगर रचनाकार रिक्त पदावर दि.१०.०३.२०१५ (म.पू.) पासून पदस्थापना देण्यात आली आहे. त्यानुसार श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार हे त्या पदावर दि.१०.०३.२०१५ (म.पू.) पासून रुजू झाले आहेत. अशा प्रकारे श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार हे तत्कालीन मा. मंत्री, रोजगार हमी योजना व जलसंधारण यांच्या आस्थापनेवरुन दि.२९.०९.२०१४ (म.नं.) पासून कार्यमुक्त झाल्यापासून ते त्यांना कार्यकारी अभियंता, अमंलबजावणी कक्ष, नागपूर यांच्या कार्यालयात दि.१०.०३.२०१५ (म.पू.) पासून पदस्थापना मिळेपर्यंत म्हणजे दि.३०.०९.२०१४ ते दि.०९.०३.२०१५ या कालावधीत पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत होते.

**०४.** नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या संदर्भ-४ येथील दि.२९.०७.२०१५ च्या पत्रान्वये श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा दि.३०.०९.२०१४ ते दि.०९.०३.२०१५ हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर करण्यात आला आहे.

**०५.** सबब, श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा दि.३०.०९.२०१४ ते दि.०९.०३.२०१५ हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. ललित मुऱ्हारी खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार, कार्यकारी अभियंता, अमंलबजावणी कक्ष, नागपूर यांचा दि.३०.०९.२०१४ (म.पू.) ते दि.०९.०३.२०१५ (म.नं.) हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (१४) (फ) (शर्त क्रमांक ०१) अन्वये "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

०२. श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार, कार्यकारी अभियंता, अमंलबजावणी कक्ष, नागपूर यांना दि.३०.०९.२०१४ (म.पू.) ते दि.०९.०३.२०१५ (म.नं.) या कालावधीत प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत राहावे लागले, ते याकरिता व्यक्तीशः जबाबदार नव्हते.

०३. श्री. ल. मु. खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनाकार यांना दि.३०.०९.२०१४ (म.पू.) ते दि.०९.०३.२०१५ (म.नं.) या कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते अदा करण्याबाबत संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

०४. सदरचे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र.सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि.०२ जून, २००३ अन्वये "नियुक्ती प्राधिकारी" यांना प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५१००९१११२५३९७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.10.09 11:15:27 +05'30'

**( दि. सि. अणेराव )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. **संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, तळ मजला, पुणे. (३-प्रती)**
५. सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर.
६. कार्यकारी अभियंता, अमंलबजावणी कक्ष, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. . ललित मुऱ्हारी खोब्रागडे, सहाय्यक नगर रचनकार, कार्यकारी अभियंता अमंलबजावणी कक्ष, नागपूर, यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**
९. निवडसंग्रह / नवि-२७.

*****